**माथाडी मंडळाच्या प्रशासकीय कामकाजामध्ये सुधारणा सुचविण्यासाठी उप समिती स्थापन करणे**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.यूडब्ल्यूए २०१८/प्र.क्र.७८९/काम.५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २९ ऑक्टोबर, २०१८.**

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने नेमलेल्या माथाडी मंडळांच्या कामकाजाविषयक चौकशी समितीचा अहवाल शासनास दिनांक २०.१०.२०१८ रोजी प्राप्त झालेला आहे. या अहवालात माथाडी मंडळाची रचना व माथाडी मंडळाच्या कामकाजाच्या सुसूत्रीकरणासाठी कोणकोणत्या उपाययोजना करणे आवश्यक आहे या तसेच अन्य महत्वपूर्ण शिफारशी विकास आयुक्त (असंघटीत कामगार) यांच्या अध्यक्षतेखालील या समितीने शासनाला सादर केलेल्या आहेत. चौकशी समितीने दिलेल्या अहवालाच्या आधारे शासन स्तरावरुन पुढील कार्यवाही करण्यापूर्वी मंडळाचे सध्याचे कामकाज, त्यांची रचना, त्यांना येणाऱ्या अडचणी, माथाडी कामगारांचे प्रश्न, त्यावर करावयाच्या उपाययोजना या अनुषंगाने पुढील सात दिवसांत अभ्यास करुन त्याचा लेखी अहवाल शासनास सादर करावा, याकरिता कामगार आयुक्त यांच्या अधिपत्याखालील कार्यरत कामगार सह आयुक्त (माथाडी) व इतर अधिकाऱ्यांची एक उप समिती गठीत करण्याचे व सदर समितीच्या कार्यकक्षा निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

माथाडी मंडळाच्या कामकाजाच्या सुसूत्रीकरणासाठी कोणकोणत्या उपाययोजना करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे मंडळाचे सध्याचे कामकाज, त्यांची रचना, त्यांना येणाऱ्या अडचणी, माथाडी कामगारांचे प्रश्न, त्यावर करावयाच्या उपाययोजना शासनाला सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे उप समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | श्री.रविराज इळवे, प्रभारी सह आयुक्त (माथाडी) | -- | अध्यक्ष |
| २) | श्री.वि.के.बुवा, अप्पर कामगार उपायुक्त, कोकण विभाग | -- | सदस्य |
| ३) | श्री.शैलेंद्र पोळ, कामगार उपायुक्त तथा औरंगाबाद माथाडी व असंरक्षित कामगार मंडळ | -- | सदस्य |
| ४) | श्री.वि.रा.पानबुडे, कामगार उपायुक्त तथा अध्यक्ष, किराणा बाजार व दुकाने मंडळ, मुंबई | -- | सदस्य |
| ५) | श्री.बी.आर.देशमुख, कामगार उपायुक्त तथा अध्यक्ष, लोखंड व पोलाद बाजार कामगार मंडळ, मुंबई | -- | सदस्य |
| ६) | श्री.विश्वास जाधव, सहायक कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, माल वाहतूक कामगार मंडळ, बृहन्मुंबई | -- | सदस्य |
| ७) | श्री.चेतन जगताप, सहायक कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, पुणे माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार मंडळ | -- | सदस्य |
| ८) | श्री.मंगेश झोले, सरकारी कामगार अधिकारी तथा सचिव, कापड बाजार आणि दुकाने मंडळ, मुंबई | -- | सदस्य |
| ९) | श्री.प्रविण जाधव, सहायक कामगार आयुक्त, मुंबई शहर | -- | सदस्य सचिव |

**उप समितीची कार्यकक्षा :**

१) योजनेची अंमलबजावणी करीत असताना अधिनियमाच्या व योजनेच्या तरतूदीनुसार अधिक प्रभावी अंमलबजावणी व्हावी यासाठी उपाययोजना सुचविणे.
२) माथाडी कामगारांकरिता सामाजिक सुरक्षा योजना राबविण्यासाठी सूचना करणे.
३) मंडळाच्या लेखे संदर्भातील कार्यपद्धतीमध्ये आवश्यक सुधारणा सुचविणे.
४) मंडळ स्तरावरील आर्थिक खर्चासंदर्भातील कार्यपद्धतीमध्ये सुधारणा सुचविणे.
५) मंडळाचे कार्यालय व मालमत्ता व याबाबतच्या नोंदी घेणे व त्याबाबत सूचना सुचविणे.
६) मंडळाच्या बँक ठेवी, कागदपत्र वर्गीकरण इत्यादी बाबत सध्याचे धोरण व त्यात आवश्यक सुधारणा करणेसाठी सूचना करणे.
७) मंडळाच्या कार्यपद्धतीमध्ये सुसूत्रीकरण व सुधारणा करण्याच्या दृष्टीने उपाययोजना सुचविणे.
८) माथाडी कामगारांचे वेतन, बोनस, दंडाची रक्कम इत्यादी अदा करणे व कामगारांच्या खात्यामध्ये थेट जमा करणे त्याचप्रमाणे नियमानुसार करावयाच्या कपातीव्यतिरिक्त इतर कपातीबाबत ECS पद्धतीद्वारे कपात करण्याबाबत कार्यपद्धती निश्चित करणे यासंदर्भात सूचना करणे.

**उप समितीने शिफारशी/सूचना करताना खालीलप्रमाणे कार्यवाही करणे आवश्यक आहे.**

सदर उप समितीने गठीत झाल्यापासून कामकाजाच्या **आठ** दिवसांत याविषयी सखोल चर्चा करुन, कागदपत्रांची पडताळणी करुन, प्रत्येक मंडळांना भेटी देऊन वस्तुस्थिती जाणून घ्यावी व त्यांना देण्यात आलेल्या विषयाच्या अनुषंगाने शासनास अहवाल सादर करावा.

अहवाल सादर करताना मंडळाच्या सध्याच्या रचनेमध्ये येणाऱ्या अडचणींना कारणीभूत असणाऱ्या बाबी स्पष्ट उदघृत करुन नेमकी कोणती उपाययोजना करावी याबाबतची शिफारस करण्यात यावी

वरील प्रक्रिया करताना शासनाला देण्यात येणारा अहवाल हा त्यासोबत पडताळणी केलेल्या कागदपत्रांच्या प्रतीसह देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२९१८०५१३५६१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.Shrikant L. Pulkundwar

Digitally signed by Dr.Shrikant L. Pulkundwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, serialNumber=c10a1e6c8fbe08c1180978bd3ed8a151ed05202d522b09b9960341c2f080906d, cn=Dr.Shrikant L. Pulkundwar
Date: 2018.10.29 18:33:57 +05'30'

**( डॉ.श्री.ल.पुलकुंडवार )**
**शासनाचे उप सचिव.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र यांचे सचिव (पत्राने),
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, अ-६, मंत्रालयासमोर, नरीमन पॉईंट, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई,

६. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९. मा.प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहायक, मुंबई,
११.कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
१२.विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
१३.श्री.रविराज इळवे, प्रभारी सह आयुक्त (माथाडी)
१४.श्री.वि.के.बुवा, अप्पर कामगार उपायुक्त, कोकण विभाग
१५.श्री.शैलेंद्र पोळ, कामगार उपायुक्त तथा औरंगाबाद माथाडी व असंरक्षित कामगार मंडळ
१६.श्री.वि.रा.पानबुडे, कामगार उपायुक्त तथा अध्यक्ष, किराणा बाजार व दुकाने मंडळ, मुंबई
१७.श्री.बी.आर.देशमुख, कामगार उपायुक्त तथा अध्यक्ष, लोखंड व पोलाद बाजार कामगार मंडळ, मुंबई
१८. श्री.विश्वास जाधव, सहायक कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, माल वाहतूक कामगार मंडळ, बृहन्मुंबई
१९.श्री.चेतन जगताप, सहायक कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, पुणे माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार मंडळ,
२०.श्री.मंगेश झोले, सरकारी कामगार अधिकारी तथा सचिव, कापड बाजार आणि दुकाने मंडळ, मुंबई,
२१.श्री.प्रविण जाधव, सहायक कामगार आयुक्त, मुंबई शहर,
२२.विभागातील सर्व कार्यासने, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
२३.निवड नस्ती/काम.५.